महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या
खंडपीठांच्या कार्यालयाकरीता नियंत्रण
अधिकाऱ्यांकडे अनुदान सुपूर्द करण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक: सप्रन्या १०८५/के. नं. ८६/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १० जुलै, १९८६.

वाचा:- शासन निर्णय क्रमांक-सप्रन्या १०८५/के. नं. ८६/१६-अ,
दिनांक ६-५-८६.

<u>निर्णय</u> :-

प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या नवी मुंबई, औरंगाबाद व नागपूर या तिन्ही खंडपीठाच्या कार्यालयांची खर्चाची तरतूद १९८६-८७ च्या अंदाजपत्रकात करण्यात आलेली नाही त्यामुळे अधिवेशनापर्यंत [दिनांक ३१-७-८६ पर्यंत] लागणारा खर्च भागविण्यासाठी शासन ज्ञापन वित्त विभाग, क्रमांक सीएनएफ-११८६/अर्थसंकल्प-१३, दिनांक ९-४-८६ अन्वये रुपये ३८,००,०००/- [रु. अडतीस लक्ष फक्त] ची आगाऊ रक्कम आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आली होती. व त्या आगाऊ रकमेतून तिन्ही खंडपीठाच्या ठिकाणच्या महसूल आयुक्तांना अनुदान मंजूर करण्यात आले होते. परंतु काही प्रशासकीय व अन्य अडचणीमुळे सदर न्यायाधिकरण अजून सुरु होऊ शकलेले नाही. ह्या परिस्थितीमुळे शासन ज्ञापन वित्त विभाग, क्रमांक सीएनएफ-११८६/५/अर्थसंकल्प १३, दिनांक २७-६-८६ अन्वये आकस्मिकता निधी अग्रीम रुपये ३८,००,०००/- हा वित्त विभागाच्या सहमतीने कमी करुन रुपये ६,७४,०००/- इतका करण्यात आला आहे. त्यामुळे सदर तिन्ही खंडपीठांच्या कार्यालयासाठी लागणारा खर्च [दिनांक ३१-७-८६ अखेर] भागविण्यासाठी तिन्ही खंडपीठांच्या महसूल आयुक्तांना परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे सुधारीत अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

वरील अग्रीमातून होणार खर्च "मागणी क्र. ९, २६५ इतर प्रशासकीय सेवा, [सी] दक्षता-[सी] [दोन] महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण या लेखाशीर्षाखाली दाखविण्यात यावा व तो शासन ज्ञापन वित्त विभाग क्रमांक सीएनएफ-११८६/५/अर्थसंकल्प-१३ दिनांक २७-६-८६ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या आकस्मिक निधीतील रुपये ६,७४,००० [रु. सहा लक्ष चौऱ्याहत्तर हजार] च्या अग्रीमातून भागविण्यात यावा. या अग्रीमाची व उर्वरीत खर्चाची [ऑगस्ट ८६ ते फेब्रुवारी ८७] पूरक मागणी सादर करण्यात येत आहे.

कृ.मा.प.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक दिनांक २६-६-८६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल [लेखा परीक्षा] महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र २, नागपूर,
महालेखापाल [लेखा परीक्षा] महाराष्ट्र २, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/औरंगाबाद/ठाणे,
विभागीय आयुक्त, कोकण विभाग/नागपूर/औरंगाबाद,
विशेष कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण नवी मुंबई,
जिल्हाधिकारी, नागपूर/औरंगाबाद/ठाणे,
वित्त विभाग [का. अर्थसंकल्प-१३/अर्थसंकल्प-३/व्यय-४],
सामान्य प्रशासन विभाग [का. २५, २६ व १९].

## परिशिष्ट "अ"

[शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: मप्रन्या १०८५/के. नं. ८६/१६-अ, दिनांक २७-६-८६ चे सहपत्र]

| अ. क्र. | नियंत्रक अधिकारी-यांचे पदनाम | आहरण व संवितरण अधिकारी | मंजूर केलेल्या आकस्मिक निधीमधील अग्रीम रुपये | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | महसूल आयुक्त, कोकण विभाग | सहायक आयुक्त, कोकण विभाग | ८२,००० [रुपये ब्याऐंशी हजार फक्त] | आवर्ती व अनावर्ती खर्चासाठी तपशील परिशिष्ट "ब" मध्ये पहावा. |
| २ | महसूल आयुक्त, औरंगाबाद | सहायक आयुक्त, औरंगाबाद विभाग | १,८५,००० [रुपये एक लाख पंच्याऐंशी हजार] | |
| ३ | महसूल आयुक्त, नागपूर | सहायक आयुक्त नागपूर विभाग | ४,०७,००० [रुपये चार लाख सात हजार फक्त] | |

## परिशिष्ट "ब"

आवर्ती रुपये
अनावर्ती रुपये

खर्च रुपये ६,७४,०००

| | मुंबई | औरंगाबाद | नागपूर |
|---|---|---|---|
| १] वेतन व भत्ते | रुपये १०,००० | ६,८०५.०० | १८,४५३.०० |
| २] आवर्ती खर्च [जागेचे भाडे] | --- | ५२,०००.०० | १,७३,८७५.०० |
| ३] अनावर्ती खर्च [दुरध्वनीसाठी] | रुपये ७२,००० [दुरध्वनीसाठी] | १,२६,१९५.०० [दुरध्वनी व कॅबीनेट] | २,१४,६७२.०० [दुरध्वनी व फर्नीचर [केंद्र सरकारला आवश्याचे] |
| | ८२,००० | १,८५,०००.०० | ४,०७,०००.०० |